तंत्रशिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रमात सहभागी संस्थांना अनुदान वितरीत करणे बाबत...

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः WBP- २९११/(९१/१४)/तांशि-२.**

मंत्रालय विस्तार भवन,

मुंबई - ४०० ०३२

तारीख: २१ फेब्रुवारी,२०१५

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक- TEQIP-२०१०/ (०२/१०)/ तांशि-२, दि. ३१ मे २०१२.
२) मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार, यांचे पत्र क्र. F.No.१६-१३/२०१४-TS-VII (Pt.) दिनांक ७/११/२०१४
३) मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार, यांचे पत्र क्र. F.No.१६-१३/२०१४-TS-VII date (Pt.) दिनांक ७/११/२०१४
४) मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार, यांचे पत्र क्र. F.No.१६-१३/२०१४-TS-VII date (Pt.) दिनांक ७/११/२०१४
५) मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार, यांचे पत्र क्र. F.No.१६-१३/२०१४-TS-VII (Pt.) दिनांक ३०/१२/२०१४
६) मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार, यांचे पत्र क्र. F.No.१६-१३/२०१४-TS-VII (Pt.) दिनांक ३०/१२/२०१४
७) मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार, यांचे पत्र क्र. F.No.१६-१३/२०१४-TS-VII (Pt.) दिनांक ३०/१२/२०१४
८) संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र. डीटीई / एसपीएफयू /फायनान्स /२०१४ - २०१५ /२०७, दिनांक १२ डिसेंबर, २०१४.
९) संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र. डीटीई / एसपीएफयू /फायनान्स /२०१४ - २०१५ /०७, दिनांक १२ जानेवारी,२०१५.
१०) तंत्र शिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रम राबविण्यासाठी केंद्र शासनाद्वारा निर्धारीत Project Implementation Plan.

## प्रस्तावना -

जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने केंद्र शासनाव्दारा देशांतर्गत तंत्र शिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रम राबविण्यात येत आहे. उपरोक्त संदर्भ - १ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सदर कार्यक्रमात महाराष्ट्र राज्याच्या सहभागास मंत्रीमंडळाची मान्यता प्राप्त झाली आहे. त्यानुसार केंद्र शासनाने सदर कार्यक्रमात सहभागी होण्यासाठी राज्याची निवड केली असून राज्याच्या एकूण १७ संस्थांचा त्यात समावेश करण्यात आला आहे. सदर कार्यक्रमाच्या उप विभाग - १.१ व १.२ मध्ये सहभागी शासकीय, अशासकीय अनुदानित संस्थांना तथा कार्यक्रमाच्या उप विभाग - १.२ मध्ये सहभागी अशासकीय विना अनुदानित संस्थांना देय आर्थिक सहाय्यापैकी ७५% आर्थिक सहाय्य केंद्र शासनाद्वारा व २५% आर्थिक सहाय्य राज्य शासनाद्वारा उपलब्ध करूण देण्यात येणार आहे.सदर कार्यक्रमाच्या उप विभाग - १.२.१ मधिल तरतूदीनुसार या कार्यक्रमाचा उप विभाग १.१ व १.२ मध्ये सहभागी संस्थांनी त्या त्या संस्थेत Centre of Excellence स्थापन करण्यासाठी अर्ज केले होते. या संस्थापैकी राज्यातील ज्या संस्थांची निवड Centre of Excellence साठी झाली अश्या संस्थांना केंद्र शासनाने देय अनुदानाचा हप्ता उपरोक्त संदर्भ - २ ते ७ अन्वये प्राप्त झाला असून त्यात राज्य शासनाचा हिस्सा योग्य प्रमाणात समाविष्ट करुन संबंधित संस्थाना अदा करण्यासाठी तंत्र शिक्षण संचालनालयास सुपूर्द करण्याची बाब राज्य शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

तंत्रशिक्षणाच्या दर्जा सुधार कार्यक्रमांतर्गत उपरोक्त संदर्भ - २ ते ७ मधिल केंद्रशासनाच्या पत्रान्वये या कार्यक्रमात सहभागी झालेल्या संस्थाना रु. २११८.०० लाखाचे अनुदान वितरीत झाले असून त्यात राज्यशासनाचा हिस्सा रु. ७०६.०० लाख समाविष्ट करुन एकुण रु. २८२४.०० लाख एवढ्या रक्कमेचे अनुदान संबंधित संस्थांना अदा करण्यासाठी तंत्र शिक्षण संचालनालयास वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. संस्थांना वितरित करावयाचा निधी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेमार्फत अधिदान व लेखा अधिदान व लेखा कार्यालयात देयक सादर करुन आहरित करण्यात यावा. सदर कार्यवाहीकरिता संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी आणि लेखा अधिकारी, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर अनुदान कार्यक्रमांतर्गत सहभागी संस्थाना निम्न तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे उपलब्ध करण्यासाठी तंत्र शिक्षण संचालनालयाने या कार्यक्रमासाठी निर्धारीत कार्यपध्दतीचा वापर करावा.

अ) **केंद्र शासनाच्या F.No.१६-१३/२०१४-TS-VII दिनांक ७/११/२०१४ च्या पत्रान्वये निधी वितरीत करावयाच्या संस्था :-**

| अ.क्र. | संस्थेचे नाव | Sub Component of TEQIP - २ | केंद्र शासनाचा हिस्सा (रु. लाखात) | राज्य शासनाचा हिस्सा (रु. लाखात) | एकूण (रु. लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| १ | बीव्हीबी स सरदार पटेल कॉलेज ऑफ इंजिनिअरींग, मुंबई | १.१ | ११२.५० | ३७.५० | १५०.०० |
| २ | भारती विदयापीठ युनिव्हर्सिटी, कॉलेज ऑफ इंजिनिअरींग, पुणे | १.१ | ६०.०० | २०.०० | १००.०० |
| ३ | कॉलेज ऑफ इंजिनिअरींग, पुणे | १.२ | १५०.०० | ५०.०० | २००.०० |
| ४ | शासकीय अभियांत्रिकी महाविदयालय, औरंगाबाद | १.२ | १८७.५० | ६२.५० | २५०.०० |
| ५ | रसायन तंत्रज्ञान संस्था, मुंबई | १.२ | ११२.५० | ३७.५० | १५०.०० |
| ६ | वीरमाता जिजाबाई तंत्रज्ञान संस्था, मुंबई | १.२ | २२५.०० | ७५.०० | ३००.०० |
| ७ | श्री. गुरु गोविंद सिंगजी इन्स्टिटयूट ऑफ इंजिनिअरींग अँड टेक्नॉलॉजी, नांदेड | १.२ | ११२.५० | ३७.५० | १५०.०० |
| ८ | वालचंद कॉलेज ऑफ इंजिनिअरींग, सांगली | १.२ | ११२.५० | ३७.५० | १५०.०० |
| ९ | जी. एच. रायसोनी कॉलेज ऑफ इंजिनिअरींग, नागपूर | १.२ | १८.०० | ६.०० | ३०.०० |
| १० | राजारामबापु इन्स्टिटयुट ऑफ टेक्नॉलॉजी, इस्लामपुर, सांगली. | १.२ | ९०.०० | ३०.०० | १५०.०० |
| **एकूण** | | | **११८०.५०** | **३९३.५०** | **१६३०.००** |

**ब) केंद्र शासनाच्या F.No.१६-१३/२०१४-TS-VII दिनांक ३०/१२/२०१४ च्या पत्रान्वये निधी वितरीत करावयाच्या संस्था :-**

| अ.क्र. | संस्थेचे नाव | Sub Component of TEQIP - २ | केंद्र शासनाचा हिस्सा (रु. लाखात) | राज्य शासनाचा हिस्सा (रु. लाखात) | एकूण (रु. लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| १ | युनिव्हर्सिटी डिपार्टमेंट ऑफ टेक्नॉलॉजी, नार्थ महाराष्ट्र युनिव्हर्सिटी, जळगाव | १.१ | २२५.०० | ७५.०० | ३००.०० |
| २ | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती | १.२ | १५०.०० | ५०.०० | २००.०० |
| ३ | वीरमाता जिजाबाई तंत्रज्ञान संस्था, मुंबई | १.२ | १५०.०० | ५०.०० | २००.०० |
| ४ | वालचंद कॉलेज ऑफ इंजिनिअरिंग, सांगली | १.२ | ७५.०० | २५.०० | १००.०० |
| ५ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर टेक्नॉलॉजिकल युनिव्हर्सिटी, लोणेरे, रायगड | १.२ | २२५.०० | ७५.०० | ३००.०० |
| ६ | रसायन तंत्रज्ञान संस्था, मुंबई ( Centre of Excellence) | १.२ | ११२.५० | ३७.५० | १५०.०० |
| | | **एकूण** | **९३७.५०** | **३१२.५०** | **१२५०.००** |

**उपरोक्त अ आणि ब मध्ये नमूद केलेल्या संस्थांना वितरीत करावयाचा एकत्रित तपशील खालीलप्रमाणे :**

| अ.क्र. | संस्था | केंद्र शासनाकडून ज्या पत्रान्वये निधी वितरीत केला आहे त्याचा क्रमांक | केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी | यथा प्रमाण राज्य शासनाचा निधी | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | उपरोक्त तक्ता क्रमांक अ मध्ये नमूद केलेल्या १० संस्था | F.No.१६-१३/२०१४-TS-VII दिनांक ७/११/२०१४ | ११८०.५० | ३९३.५० | १५७४.०० |

| अ.क्र. | संस्था | केंद्र शासनाकडून ज्या पत्रान्वये निधी वितरीत केला आहे त्याचा क्रमांक | केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी | यथा प्रमाण राज्य शासनाचा निधी | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| २ | उपरोक्त तक्ता क्रमांक ब मध्ये नमूद केलेल्या ०६संस्था | F.No.१६-१३/२०१४-TS-VII (Pt.) दिनांक ३०/१२/२०१४ | ९३७.५० | ३१२.५० | १२५०.०० |
| **एकूण** | | | **२११८.००** | **७०६.००** | **२८२४.००** |

सदर आदेशान्वये वितरीत करावयाचे अनुदान, या कार्यक्रमांतर्गत निम्न तक्त्यात नमूद लेखाशीर्षाखाली राज्य शासनाच्या व केंद्रशासनाच्या हिस्स्यासाठी करण्यात आर्थिक तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावे.

| अ.क्र. | अनुदानाचा हिस्सा | लेखाशिर्ष | एकुण आर्थिक तरतूद (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| १ | राज्य शासन | २२०३, तंत्रशिक्षण,<br>११२ (००)(२१) जागतिक बँक सहाय्यित प्रकल्प तंत्रशिक्षणाचा दर्जा सुधारण्याचा कार्यक्रम (राज्य हिस्सा) (२२०३ ३१४८)<br>३१ सहाय्यक अनुदान, मागणी डब्ल्यू - ३ | २२५०.०० |
| २ | केंद्र शासन | २२०३, तंत्रशिक्षण,<br>११२ (००)(२२) जागतिक बँक सहाय्यित प्रकल्प तंत्रशिक्षणाचा दर्जा सुधारण्याचा कार्यक्रम (केंद्र हिस्सा) (२२०३ ३१५७)<br>३१ सहाय्यक अनुदान, मागणी - डब्ल्यू - ३ | १०५००.०० |

सदर आदेशान्वये उपरोक्त अनुदानाचा विनियोग करताना संबंधित संस्थांकडून संदर्भ -१० मध्ये नमूद Project Implementation Plan तथा संदर्भ - २ ते ७ मध्ये नमूद कार्यपध्दती आणि विहीत अटी व शर्तीचे पालन करणे आवश्यक राहील.

उपरोक्त सहाय्यक अनुदान हे ज्या कामासाठी वितरीत केलेले आहे ते त्या कामासाठीच वापरण्यात यावे. तसेच तपशीलवार शिर्षाखालील उर्वरीत निधी वितरण करण्यासाठी वित्त विभागास अपेक्षित असलेली माहिती व पूर्वी वितरीत केलेल्या रक्कमांचे विनियोग प्रमाणपत्रे तंत्रशिक्षण संचालनालयाने तात्काळ सादर करावीत.

सदर आदेश नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र. अनुक्रमे १८/१४७१,दि.२१/०१/२०१५ तथा व्यय-५, दि. २३/०१/२०१५ व ३३३/अर्थोपाय, दि.०३.०२.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०१५०२२४१५२७२०२००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AVHAD PRAKASH B

Digitally signed by AVHAD PRAKASH B
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=AVHAD PRAKASH B
Date: 2015.02.24 15:37:50 +05'30'

**( प्रकाश भास्करराव आव्हाड )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ५ प्रति
२. संचालक/ प्राचार्य, सर्व संबंधित संस्था (संचालक, तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
५. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
६. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
७. अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
८. निवड नस्ती, तांशि-२.